राष्ट्रीय शहरी आरोग्य अभियानांतर्गत मुंबई शहरात जेएसएसके लाभार्थ्यांना मोफत (ड्रॉप बॅक) रुग्णालय ते निवास संदर्भ सेवा देण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१११८/प्र.क्र.६१४/आरोग्य -७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०१९.

वाचा :-

१) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे पत्र क्र. जा.क्र.राआसो/RT/प्रशासकीय मान्यता/६०६७३/२०१८, दिनांक १९ नोव्हेंबर, २०१८.
२) प्रकल्प संचालक (ईएमएस), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र दिनांक ०३ जानेवारी, २०१९.

प्रस्तावना :-

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत रेफरल ट्रान्सपोर्ट हा कार्यक्रम जिल्हास्तरावर जिल्हा शल्यचिकित्सक व त्याचप्रमाणे जिल्हा परिषदेच्या आरोग्य विभागातर्फे राबविण्यात येतो. राज्यातील माता मृत्यूदर तसेच बाल मृत्यूदर कमी करणे व गर्भवती महिला व गंभीर आजार नवजात बालकांना रेफरल ट्रान्सपोर्ट देण्याच्या उद्देशाने या कार्यक्रमात प्रसुतीपूर्व वेदनेच्या काळात व प्रसुतीसाठी निवासस्थानापासून रुग्णालयापर्यत, प्रसुतीनंतर मातेला व नवजात बालकाला निवासस्थानी पोहचविण्यासाठी तसेच गंभीर आजारी बाळ (० ते १ वर्ष) यांना निवासस्थानापासून रुग्णालयात घेऊन जाण्याची मोफत वाहन सेवेची सोय करण्यात आलेली आहे. सदर रुग्णवाहिका/ परतीच्या प्रवासाठी वाहन सेवा १०२ क्रमांकाच्या टोल फ्रि कमांकावर नागरीकांना पूर्णपणे मोफत करुन देण्यात आलेली आहे. रेफरल ट्रान्सपोर्ट या कार्यक्रमांतर्गत ३४ जिल्ह्यांमध्ये सदर कार्यक्रम ऑक्टोंबर, २०११ पासून कार्यान्वित झालेला आहे.

वरील विषयाच्या अनुषंगाने मुंबई शहरासाठी जेएसएसके लाभार्थ्यांना Drop Back रुग्णालय ते घर सेवा सुरु करण्यासाठी राष्ट्रीय शहरी आरोग्य अभियानांतर्गत सन २०१८-१९ मध्ये केंद्र शासनाकडून Aggregators द्वारे भाडे तत्वावर वाहने घेऊन सदर जेएसएसके लाभार्थ्यांना (रुग्णालय ते घर) Drop Back सेवा मोफत देण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय :-

मुंबई शहरासाठी जेएसएसके लाभार्थ्यांना Drop Back (रुग्णालय ते घर) सेवा सुरु करण्यासाठी राष्ट्रीय शहरी आरोग्य अभियानांतर्गत सन २०१८-१९ मध्ये केंद्र शासनाकडून Aggregators द्वारे भाडे तत्वावर वाहने घेऊन सदर जेएसएसके लाभार्थ्यांना Drop Back सेवा (रुग्णालय ते घर) मोफत देण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर होणारा खर्च सन २०१८-१९ पीआयपीमध्ये लेखाशिर्ष FMR Code U.७.१ अंतर्गत Free Referral Transport Drop back Services to JSSK beneficiaries in MCGM या घटकाखाली मंजुर झालेल्या रु.२५०.०० लक्ष अनुदानातून करण्यात यावा.

२. सदरची प्रशासकीय मान्यता प्रशासकीय मान्यता खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर सेवेबाबत आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबीची निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू बाबीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. सदरहू बाबीचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. पीआयपी मध्ये मंजूर असलेल्या बाबींच्या तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावातील समाविष्ट असलेल्या बाबींवरच निविदा प्रक्रिया करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी

करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित बाबींचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे निविदा प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) सदर सेवेबाबत पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असल्याची खात्री करण्यात यावी.

६) सदरहू बाबीसाठी होणारा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राज्य आरोग्य सोसायटीकडून सन २०१८-१९ साठी उपलब्ध करुन दिलेल्या लेखाशिर्ष FMR Code U.7.1 अंतर्गत Free Referal Transport Drop back Services to JSSK benifisheries in MCGM या घटकाखाली मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदरची निविदा प्रक्रिया प्रशासकीय मंजुरीच्या विहित कालावधीत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

७) तसेच, या बाबींची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

८) संपूर्ण निविदा प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

९) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

१०) निविदा प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

३. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १० येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची तसेच यासंदर्भात काही सेवा घ्यावयाची असल्यास ती नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, मुंबई व राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील

अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०४१२३४५५३६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILESH MADHUKAR FALAKE

Digitally signed by NILESH MADHUKAR FALAKE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9b937361525edcb194dec2d7985fb077e5abd6b9fad45b976539bce4d36b0b69, postalCode=400001, street=10TH FLOOR,G T HOSPITAL COMPLEX,NEW MANTRALAY,MUMBAI, serialNumber=e09d55875f0b34f40ea67d594e0e55772eb9527cde52579d6523580dfc4d1783, ou=PHD MANTRALAYA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=NILESH MADHUKAR FALAKE
Date: 2019.02.28 11:35:54 +05'30'

**( निलेश फाळके )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
२) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
३) सहसंचालक (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५) वरिष्ठ सल्लागार, पीपीपी, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)